तात्काळ

दिनांक २५ जुलै, २००१ रोजी होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या लाक्षणिक संपाबाबत करावयाची कार्यवाही.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांकः एसटीके-१००१/प्र.क्र.१०३/२००१/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १८ जुलै, २००१.

**परिपत्रक**

शासकीय वाहन चालक संघटना, मंत्रालय, मुंबई यांनी संघटनेच्या विविध मागण्यांकडे शासनाचे लक्ष वेधण्याकरीता सर्व वाहन चालक, केंद्र शासकीय कर्मचारी व राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसमवेत दि.२५.७.२००१ रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करणार असल्याची सूचना दिली आहे. त्याचप्रमाणे सदर संपामध्ये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या इतर संघटनांचे सदस्यही सामील होण्याची शक्यता आहे.

२. शासकीय कर्मचाऱ्यांच्या दि.२५.७.२००१ रोजी होणाऱ्या एक दिवसाच्या लाक्षणिक संपकाळात शासकीय काम सुरळीतरित्या चालण्याच्या दृष्टीने पुढे दर्शविल्याप्रमाणे उपाययोजना करण्याच्या सूचना सर्व मंत्रालयीन विभाग तसेच त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांना देण्यात येत आहेत.

१) शासकीय कर्मचाऱ्यांनी संपात भाग घेणे गैरवर्तणूक समजण्यात येईल व अशा कर्मचाऱ्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, अशा प्रकारचे आदेश निर्गमित करण्यात यावेत व ते सर्व कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणून त्या आदेशाची प्रत सूचना फलकावर लावण्यात यावी.

२) कर्मचाऱ्यांनी संपात भाग न घेण्याविषयी व नेहमीप्रमाणे कार्यालयात उपस्थित राहण्यासाठी त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करावा.

३) संपकाळात कार्यालये उघडण्याची व बंद करण्याची योग्य ती व्यवस्था करावी व ती व्यवस्था जबाबदार अधिकाऱ्याकडे द्यावी. गरज भासल्यास गृहरक्षक दलाची मदत घ्यावी.

४) कार्यालयप्रमुखांनी संपकाळात आपले मुख्यालय सोडून जावू नये.

५) कार्यालय प्रमुखांनी या आदेशाच्या दिनांकापासून लाक्षणिक संप संपेपर्यंत कुठल्याही शासकीय कर्मचाऱ्यास कुठल्याही प्रकारची रजा मंजूर करु नये आणि जे कर्मचारी रजेवर असतील अशा प्रत्येक प्रकरणी विचार करुन त्यांची रजा रद्द करुन त्यांना कामावर तात्काळ बोलवावे किंवा कसे ते ठरवावे.

६) शासकीय कर्मचाऱ्यांच्या संपाबाबत केंद्र शासनाचे ' काम नाही वेतन नाही ' हे धोरण राज्य शासन ही अनुसरत असल्याचे कर्मचाऱ्यांना अवगत करावे.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी आपल्या अधिपत्याखालील कार्यालयांमध्ये अत्यावश्यक सेवा संपकाळात सुरळितपणे सुरु राहतील याबाबत उपाययोजना कराव्यात.

४. ह्या परिपत्रकातील सूचना विभाग प्रमुखांनी आपल्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुखांना कळविण्याची व्यवस्था करावी.

५. सदर संपाच्या दिवशी कार्यालयात उपस्थित असलेल्या कर्मचाऱ्यांची माहिती क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी त्यांच्या संबंधित मंत्रालयीन विभागांना कळवावी व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या विभागातील व अधिपत्याखालील कार्यालयांची संकलित माहिती सोबत जोडलेल्या प्रपत्रात दि.२५.७.२००१ रोजी दुपारी १२.०० पर्यंत या विभागाच्या कार्यासन १८-अ कडे द्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

बा.क. अग्रवाल १८/०७/०१.

( बा.क.अग्रवाल )
अपर मुख्य सचिव (सेवा)

प्रति,

राज्यपालांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
मंत्रालयीन विविध विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व इतर विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
* प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकायुक्त,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
* सचिव,राज्य निवडणूक आयोग,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.
* **पत्राने.**

## प्रपत्र-अ

मंत्रालयीन विभागातील / त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील कर्मचाऱ्यांची दि.२५.७.२००१ रोजी असलेल्या उपस्थितीबाबतची माहिती.

मंत्रालयीन विभाग.

| संवर्ग | एकूण अधिकारी/ कर्मचाऱ्यांची संख्या | पूर्व परवानगीने रजेवर असलेले (संख्या) | संपात सहभागी झालेले (संख्या) | कार्यालयात उपस्थित असलेले (संख्या) |
|---|---|---|---|---|
| गट - अ | | | | |
| गट - ब | | | | |
| गट - क | | | | |
| गट - ड | | | | |

## प्रपत्र-ब

क्षेत्रीय कार्यालय :-

| संवर्ग. | एकूण अधिकारी/ कर्मचाऱ्यांची संख्या | पूर्व परवानगीने रजेवर असलेले (संख्या) | संपात सहभागी झालेले (संख्या) | कार्यालयात उपस्थित असलेले (संख्या) |
|---|---|---|---|---|
| गट - अ | | | | |
| गट - ब | | | | |
| गट - क | | | | |
| गट - ड | | | | |